**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**क्रमांकः संकीर्ण २०१६/सं.क्र.२१२३/प्र.क्र.२९३/चौदा**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १६.०५.२०१७

**संदर्भ** - १) सा.प्र.वि.आदेश क्रमांक उसप्र-१३१३/प्र.क्र.२८/चौदा, दि.०७.११.२०१५
२) शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का.१२, दि.१७.१२.२०१६

**आदेश**

संदर्भाधीन आदेश क्र. १ अन्वये श्री.मं.मं.शिंदे, उपसचिव, वित्त विभाग यांची प्रथमत: एक वर्षाकरिता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाच्या आस्थापनेवरील मुख्य प्रशासकीय अधिकारी या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती. सदर प्रतिनियुक्तीचा कालावधी दि.१४.१२.२०१६ रोजी संपुष्टात आला आहे. तसेच, संदर्भाधीन क्र.२ येथे नमूद शासन निर्णयातील परिच्छेद ५(ब) (६) नुसार श्री.मं.मं.शिंदे यांनी त्यांच्या एकूण सेवेतील १० वर्षापेक्षा अधिक कालावधी प्रतिनियुक्तीवर व्यतीत केला असल्याने ते उर्वरित सेवा काळात प्रतिनियुक्तीस पात्र ठरत नाहीत. तथापि, “एक विशेष बाब” म्हणून श्री.मं.मं.शिंदे, उपसचिव, यांच्या महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाच्या आस्थापनेवरील मुख्य प्रशासकीय अधिकारी या पदावरील प्रतिनियुक्तीस दि.१५.१२.२०१६ पासून पुढे एक वर्ष म्हणजेच दि.१४.१२.२०१७ पर्यंत अंतिम मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०५१६१७०५५६४००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gajanan
Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.05.16 17:08:56 +05'30'

**( ग.भि.गुरव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. मा.मुख्यमंत्र्यांचे अ.मु.स.
३. अ.मु.स.(सेवा),सा.प्र.वि.
४. अ.मु.स./प्रधान सचिव/ सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग/ वित्त विभाग, मंत्रालय,
५. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित, वांद्रे रेक्लेमेशन डेपोसमोर, लिलावती हॉस्पिटल जवळ, के.सी.मार्ग, वांद्रे (प), मुंबई ४०० ०५०.
६. सह/उप सचिव - सार्वजनिक बांधकाम विभाग/ वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. उप सचिव, (का-१२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. श्री.मं.मं.शिंदे, मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित, वांद्रे रेक्लेमेशन डेपोसमोर, लिलावती हॉस्पिटल जवळ, के.सी.मार्ग, वांद्रे (प), मुंबई ४०००५०.
९. निवडनस्ती कार्यासन-१४.